**सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ (लेखापरीक्षण) संवर्गातील अधिकाऱ्यांना अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ (लेखापरीक्षण) संवर्गात पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस १०१३/प्र.क्र.२५७/५-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ३२
तारीख: ८/०५/२०१५

**शासन निर्णय :**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील खाली नमुद केलेल्या सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ (लेखापरीक्षण) संवर्गातील अधिकारी यांना अपर निबंधक, सहकारी संस्था गट-अ (लेखापरीक्षण) या संवर्गात तदर्थ स्वरुपात पदोन्नत करण्यात येत आहे. सदर पदोन्नती संपूर्णपणे तात्पुरत्या स्वरुपाची असून मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील क्र.टि.ए.०१/०२/२०१४, क्र.टि.ए.०२/२०१४ च्या निर्णयाच्या अधिन व आरक्षण विषयक कायद्यासंबंधात मा.उच्च न्यायालयात सुरु असलेल्या याचिकेच्या अंतिम निर्णयाच्या आणि तत्सम सेवाविषयक प्रकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहील.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, पदनाम व सध्याचे ठिकाण | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री.डी.एन.कांबळे, विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (गट-अ) (लेखापरीक्षण), मुंबई विभाग. | अपर निबंधक, सहकारी संस्था (ले.प.), अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था मुख्यालय, पुणे या रिक्त पदी |

२. उक्त पदोन्नत अधिकारी यांना मा. उच्च न्यायालयात सुरु असलेल्या आरक्षण विषयक कायद्यातील तरतूदींच्या अनुषंगाने कांही बदल झाल्यास ते संबधितांना मान्य राहतील या अटीच्या अधीन पदोन्नती देण्यात येत आहे. त्यानुसार संबधित अधिकाऱ्यांनी तशा स्वरुपाचे बंधपत्र सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्याकडे प्रथम सादर करावे व नंतर पदोन्नतीच्या पदावर रुजु व्हावे.

३. पदोन्नत अधिकारी यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतन निश्चितीसंबधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील नियम ११ (१) (एक) खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात येईल.

४. श्री. कांबळे यांनी आपल्या पदाचा कार्यभार सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या निदेशानुसार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे.

५. संबधित अधिकारी यांनी रुजु अहवाल सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

६. सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०८१७५७३८६५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang S Deokar

Digitally signed by Pandurang S Deokar
DN: CN = Pandurang S Deokar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.08 18:14:32 +05'30'

**(पां.स.देवकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (सहकार/ पणन / वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संबधित अधिकारी व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण व प्रशासन)- व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे,
८. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था - व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था -व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई/ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता)
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक
१४. अमुस (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
१५. अमुस (पणन) यांचे स्वीय सहाय्यक
१६. निवड नस्ती